जलस्वराज्य - २ कार्यक्रम.
हिवरे, ता. पुरंदर, जि. पुणे या निमशहरी गावाच्या नळ पाणी पुरवठा योजनेस सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
**शासन निर्णय क्रमांकः जस्वप्र- ०२२०/ प्र. क्र. ४५/ पापु-११**
**गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल इमारत, ७ वा मजला,**
**नवीन मंत्रालय, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई ४००००१**
**दिनांक : ०६/०१/२०२२**

**वाचा :**

१) शासन निर्णय क्रमांकः जस्वप्र -१२१३/प्र.क्र.२००/पापु-११,दि. ०४/०१/२०१४
२) शासन क्रमांकः जस्वप्र-०२/०७१५/वि.सं.क.(तां)/प्र.क्र.१३/पापु-११,दि. ०१/०१/२०१६
३) शासन निर्णय क्रमांकः जस्वका-२/०२१४/ प्र.क्र.५५/पापु-११, दि. १८/२/२०१७
४) शासन निर्णय क्रमांकः जस्वप्र-०३१७/ प्र.क्र.८२/पापु-११, दि. ०९/०५/२०१७
५) मुख्य अभियंता (प्र), म.जी.प्रा, पुणे यांचे पत्र क्र. मु.अ.(पुणे)/तांशा-२/हिवरे/२०२०/६६०, दिनांक १३/०७/२०२०.
६) अधिक्षक अभियंता (प्र) म.नि.सं.सं कक्ष मुंबई, यांचे पत्र क्र. मजीप्रा/मनिसंसं कक्ष/तांशा.ग्रा/ २०७/२०२०, दि. २४/९/२०२०.

**प्रस्तावना :-**

हिवरे ता. पुरंदर, जि. पुणे या निमशहरी नळ पाणी पुरवठा योजनेच्या अंदाजपत्रकास संदर्भ क्र. ४ येथील शासन निर्णयानुसार प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. सदरहू योजनेची अंमलबजावणी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामार्फत करण्यात आली आहे. योजनेच्या उपांगात झालेल्या तांत्रिक बदलामुळे व ऑटोमेशनची तरतूद समाविष्ट करण्यात आल्यामुळे योजनेच्या खर्चात वाढ झाली आहे. त्यानुषंगाने सुधारीत प्रशासकीय मान्यतेसाठीचा प्रस्ताव संदर्भ क्र. ६ येथील पत्रान्वये अधीक्षक अभियंता (प्र) म.नि.सं.सं कक्ष मुंबई यांनी शासनास सादर केला आहे.

२. हिवरे ता. पुरंदर, जि. पुणे या निमशहरी योजनेच्या उपांगात झालेला तांत्रिक बदल व ऑटोमेशनची तरतूद समाविष्ट करण्यात आल्यामुळे योजनेच्या खर्चात वाढ झाली असल्याने योजनेच्या अंदाजपत्रकास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय : -**

**हिवरे ता. पुरंदर, जि. पुणे या निमशहरी नळ पाणी पुरवठा योजनेच्या रु.१७,७०३/- इतका दरडोई खर्च असलेल्या रु. ५,६४,९८,५००/- (रुपये पाच कोटी चौसष्ट लक्ष अठ्ठयाण्णव हजार पाचशे फक्त) इतक्या ढोबळ किमतीच्या अंदाजपत्रकास खालील अटींच्या अधीन राहून सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.**

**१. योजनेची अंमलबजावणी**

i. जलस्वराज्य-२ कार्यक्रमांतर्गत जागतिक बँकेकडून उपलब्ध होणारे अर्थसहाय्य ठराविक उद्दिष्टपूर्ती निर्देशकांच्या आधारे प्राप्त होणार असल्याने योजनेमध्ये १००% जलमापकासह नळजोडण्या देणे व सदर नळजोडण्यांमधून होणारा पाणी पुरवठा सातत्याने व समाधानकारकरित्या सुरु राहणे बंधनकारक राहील.

ii. हिवरे ता. पुरंदर, जि. पुणे या निमशहरी नळ पाणी पुरवठा योजनेच्या सुधारीत तांत्रिक मान्यता आदेशात नमूद केलेल्या अटी व शर्तींचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

iii. भौतिक व आर्थिक प्रगती अहवाल महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने शासनास वेळोवेळी सादर करावा.

iv. योजनेमध्ये जलमापकासह नळजोडण्या प्रस्तावित करण्यात आल्याने शासनाने मंजूर केलेल्या जलमापकाच्या धोरणानुसार कार्यवाही करावी.

**२. देखभाल व दुरुस्ती**

i. योजनेची भौतिक कामे पूर्ण झाल्यानंतर योजना स्वयंनिर्भर होण्याच्या दृष्टीने योजनेच्या वार्षिक देखभाल व दुरुस्ती अंदाजपत्रकास ग्रामसभेची मान्यता घेवून आवश्यक पाणीपट्टी आकारणे तसेच ५ वर्षांच्या कालावधीसाठी मूळ / ग्रामपंचायतीने नियुक्त केलेल्या कंत्राटदाराकडून अथवा ग्रामसभेच्या स्वतंत्र प्रक्रियेद्वारे देखभाल व दुरुस्ती करुन घेण्याची जबाबदारी ग्रामपंचायतीची राहील.

ii. सुरुवातीच्या १ वर्षासाठीच्या देखभाल व दुरुस्तीसाठीची तरतूद सविस्तर प्रकल्प अहवालात नमूद करण्यात आली आहे. त्यानंतरच्या ४ वर्षांच्या देखभाल व दुरुस्तीसाठी कामगारांचा पगार, वीज देयके व जलशुद्धीकरणासाठी लागणारी रसायने इ. करिता लागणारा खर्च कंत्राटदारास देण्याची जबाबदारी संबंधित ग्रामपंचायतीची राहील. हा खर्च ग्रामपंचायतीने पाणीपट्टी वसूलीच्या रकमेमधून करावा.

iii. योजनेच्या देखभाल व दुरुस्तीसाठी शासनामार्फत कोणत्याही प्रकारचे अनुदान देण्यात येणार नाही.

**३. त्रयस्थ तांत्रिक परीक्षण**

i. त्रयस्थ पडताळणी यंत्रणेकडून तपासणी करण्यापूर्वी योजनेच्या कामाचे / साहित्याचे गुणवत्तेच्या दृष्टीने तांत्रिक परीक्षण महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या गुणवत्ता परीक्षण पथकाकडून करण्यात यावे व याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

## ४. निधी वितरण

i. प्रस्तुत योजना यापुढे पूर्नसुधारित होणार नाही याची सर्वस्वी जबाबदारी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाची राहील.

ii. योजनेच्या अंमलबजावणीसाठी निधी वितरण संदर्भ क्र. ३ मधील शासन निर्णयात नमूद केल्याप्रमाणे राहील.

iii. कोणत्याही कारणाने योजनेच्या खर्चात वाढ झाल्यास वाढीव खर्चापोटी कोणत्याही प्रकारचे शासकीय अनुदान उपलब्ध करुन दिले जाणार नाही.

**५.** या योजनेवर होणारा खर्च भारतीय रिझर्व बँक, मुंबई येथे उप सचिव तथा प्रकल्प संचालक, सुधारणा सहाय्य व प्रकल्प व्यवस्थापन कक्ष यांचे नावे उघडण्यात आलेल्या स्वीय प्रपंजी खाते क्र. ६१८४३५००१० मधील उपलब्ध निधीमधून भागविण्यात येईल.

**६.** सदर शासन निर्णय मा.अध्यक्ष,तथा प्रधान सचिव (व्यय), शक्ती प्रधान समिती यांच्या मान्यतेने व वित्त विभाग अनौ.संदर्भ क्रमांक ६९२४,दि.२२.११.२०२१ अन्वये देण्यात आलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०१०५०९४२३०२१२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ANIL NIWRUTTI DHAS

Digitally signed by ANIL NIWRUTTI DHAS
Date: 2022.01.06 18:07:54 +05'30'

(अनिल धस)
**अवर सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.

२. मा. मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

३. मा. विरोधी पक्ष नेता,विधानसभा/विधानपरिषद, महाराष्ट्र विधीमंडळ सचिवालय, मुंबई.

४. मा. विधानसभा / विधानपरिषद सदस्य (सर्व), महाराष्ट्र विधीमंडळ सचिवालय, मुंबई.

५. मुख्य सचिव यांचे सह सचिव, मंत्रालय, मुंबई.

६. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.

७. विभागीय आयुक्त, प्रादेशिक विभागीय कार्यालय, नाशिक.

८. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.

९. संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे.

१०. मुख्य अभियंता तथा विशेष कार्य अधिकारी,पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,मंत्रालय मुंबई.

११. मिशन संचालक,जल जीवन मिशन, राज्य पाणी व स्वच्छता मिशन, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई.

१२. जिल्हाधिकारी, पुणे.

१३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पुणे.

१४. मुख्य अभियंता, प्रादेशिक विभाग, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, पुणे.

१५. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई.

१६. महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), नागपूर.

१७. निवड नस्ती (कार्यासन पापु-११), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, बेलापूर, नवी मुंबई.

१८. निवड नस्ती (कार्यासन पापु-४, ५, ७, २०), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.